सामाजिक न्याय विभागाअंतर्गत कार्यरत
असलेल्या महामंडळाच्या लाभार्थ्यांना
कर्ज माफी देणेबाबत...

# महाराष्ट्र शासन

सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,
शासन निर्णय, क्र.बैठक-२००९/प्र.क्र.२७/भाग-२/विघयो-२
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- १ जुलै, २०१०

वाचा:- १) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,
क्र.बैठक-२००९/प्र.क्र.२७/विघयो-२,दिनांक:- २५ ऑगस्ट,२००९

**प्रस्तावना :-** शासन निर्णय, दिनांक २५.८.२००९ अन्वये सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या नियंत्रणाखालील पाच मागासवर्गीय व एक अपंग महामंडळ अशा एकूण सहा महामंडळाच्या लाभार्थ्यांना कर्ज माफी देण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. या कर्जमाफीअंतर्गत प्रथमतः लाभार्थ्यांचे दि.३१/३/२००८ अखेर थकीत असलेले राज्य महामंडळाचे व्याजासह कर्ज रु.१३४.४१ कोटी माफ करण्यात आले आहे. राष्ट्रीय महामंडळ व राष्ट्रीय बँकांचे थकीत असलेले कर्ज व व्याज माफ करण्याबाबत वाटाघाटी करुन एकवेळ समायोजन करुन रक्कम निश्चित करण्याबाबत प्रधान सचिव (वित्त) यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्यात आलेली आहे. समितीच्या वेळोवेळी बैठका होऊन राष्ट्रीय बँकाकडून प्राप्त झालेल्या माहितीस अनुसरुन दिनांक ३१/३/२००८ अखेर थकित असलेले राष्ट्रीय बँकाचे कर्ज व व्याजाची रक्कम निश्चित करण्यात आलेली आहे. सदर रक्कम राष्ट्रीय बँकांना संबंधित महामंडळामार्फत उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

<u>**शासन निर्णय**</u> **:-** सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या नियंत्रणाखालील पाच मागासवर्गीय व एक अपंग महामंडळ अशा एकूण सहा महामंडळाच्या लाभार्थ्यांचे दिनांक ३१/३/२००८ अखेर राष्ट्रीय बँकांचे व्याजासह थकित असलेले एकूण रु.११४.०५ कोटी (अक्षरी रु. एकशे चौदा कोटी पाच लाख फक्त) कर्ज " परिशिष्ट अ " मध्ये नमूद केल्याप्रमाणे बँकांना खालील अटींच्या अधीन राहून सर्व संबंधित महामंडळामार्फत अदा करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

१. राष्ट्रीय बँकांना अनुज्ञेय वितरीत करताना लाभार्थी राज्य महामंडळाचे व बँकाचे कर्जास पुन्हा पात्र ठरेल या दृष्टीकोनातून महामंडळाने कार्यप्रणाली ठरवावी.
२. महामंडळांनी तसेच राष्ट्रीय बँकांनी लाभार्थ्यांना ना-हरकत प्रमाणपत्र द्यावे.
३. महामंडळांनी लाभार्थीनिहाय रक्कम बँकांना वितरीत करावी.
४. शासन निर्णय दिनांक २५/८/२००९ अन्वये राज्य महामडळाचे रु.१३४.४१ कोटी माफ करण्यात आलेल्या व्याजासह कर्जाची व या शासन निर्णयान्वये बँकांना अदा केलेल्या रक्कमेची नोंद महामंडळाने त्यांच्या लेख्यामध्ये घ्यावी.

३. महात्मा फुले मागासवर्ग विकास महामंडळ, लोकशाहीर अण्णाभाऊ साठे विकास महामंडळ व संत रोहिदास चर्मोद्योग व चर्मकार विकास महामंडळ या तीन महामंडळांनी त्यांना सन २००८-०९ या आर्थिक वर्षात वितरीत करण्यात आलेल्या भागभांडवलाच्या तरतूदीमधून संबंधित राष्ट्रीय बँकांना देय असलेली रक्कम ( परिशिष्ट अ मध्ये नमूद केल्याप्रमाणे ) अदा करावी.

क्र.मा...

तसेच वसंतराव नाईक विमुक्त जाती भटक्या जमाती विकास महामंडळ, महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्ग वित्त व विकास महामंडळ व महाराष्ट्र राज्य अपंग वित्त व विकास महामंडळ या तीन महामंडळांनी संचालक, समाज कल्याण, पुणे यांचे नावे स्टेट बँक ऑफ इंडिया , पुणे शाखा येथे उघडण्यात आलेल्या स्वीय प्रपंची लेखा (Personal Ledger Account) क्र. MH-८४४३-१०६-PD/PLA- Director Social Welfare, Pune मध्ये सन २००९-१० या आर्थिक वर्षात भाग भांडवलाची जमा करण्यात आलेल्या तरतूदीतून संबंधित राष्ट्रीय बँकांना देय असलेली रक्कम (परिशिष्ट-अ मध्ये नमूद केल्याप्रमाणे ) त्यांना अदा करावी.

३. संचालक, समाज कल्याण, पुणे यांनी **"परिशिष्ट अ"** मध्ये नमूद केल्याप्रमाणे वसंतराव नाईक विमुक्त जाती भटक्या जमाती विकास महामंडळ, महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्ग वित्त व विकास महामंडळ व महाराष्ट्र राज्य अपंग वित्त व विकास महामंडळ या तीन महामंडळांना निधी वितरीत करावा.

४. सर्व महामंडळाने वरीलप्रमाणे कर्जमाफीची कार्यप्रणाली पुर्ण करुन प्रत्यक्ष किती रक्कम खर्च झाली. याबाबतची कार्यवाही लवकरात लवकर करावी व तसा अहवाल तीन महिन्यात सादर करावा.

५. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

६. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०१००७०२१४२२४२००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

( जगदेव न.राठोड )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,
मा.राज्यपाल यांचे सचिव
मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव
मा.सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
मा.मुख्यसचिव यांचे स्वीय सहाय्यक
सर्व मंत्रालयीन विभागाचे अमुस/प्रस/सचिव
सर्व संबंधित महामंडळांचे व्यवस्थापकिय संचालक
महालेखापाल महाराष्ट्-१/२, मुंबई/नागपूर
संचालक, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
आयुक्त, अपंग कल्याण, पुणे
संचालक, वि.जा.भ.ज. पुणे
सर्व विभागीय समाज कल्याण अधिकारी, मुंबई
माहिती व जनसंपर्क संचालनालय,मंत्रालय, मुंबई (५ प्रती)
ग्रंथालय,मंत्रालय, मुंबई (५ प्रती)
सर्व कार्यासने, सा.न्या.व वि.स.विभाग, मंत्रालय, मुंबई./निवड नस्ती - विघयो-२

# परिशिष्ट - अ

(रु. कोटीत)

| अ. क्र | महामंडळाचे नाव | दिनांक ३१/०३/२००८ अखेर थकीत रक्कम | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | राज्य महामंडळ | | | राष्ट्रीय बँक | | |
| | | मुद्दल | व्याज | एकूण | मुद्दल | व्याज | एकूण |
| १ | महात्मा फुले मागासवर्ग विकास महामंडळ मर्या.मुंबई | ५०.२९ | ११.१९ | ६१.४८ | ४९.६० | १३.६८ | ६३.२८ |
| २ | लोकशाहीर आण्णाभाऊ साठे विकास महामंडळ मर्या.मुंबई | १३.५० | १.८४ | १५.३४ | १८.०६ | ४.९६ | २३.०२ |
| ३ | संत रोहीदास चर्मोद्योग व चर्मकार विकास महामंडळ मर्या. मुंबई | ७.२७ | ०.५७ | ७.८४ | ७.२५ | १.९९ | ९.२४ |
| ४ | वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळ मर्या. मुंबई | ३१.०७ | २.३४ | ३३.४४ | ६.४९ | २.१७ | ८.६७ |
| ५ | महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळ मर्या. मुंबई | ९.१७ | ३.९३ | १३.१० | ६.२३ | १.६८ | ७.९१ |
| ६ | महाराष्ट्र राज्य अपंग वित्त व विकास महामंडळ मर्या. मुंबई | २.७८ | ०.४५ | ३.२१ | १.४६ | ०.४७ | १.९३ |
| | एकूण | ११४.०८ | २०.३२ | १३४.४१ | ८९.१० | २४.९६ | ११४.०५ |

(जगदेव न. राठोड)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

-------